# महाराष्ट्र शासन

<u>तात्काळ/समयमर्यादा</u>

क्रमांक : मविप १४१७/प्र.क्र.१३२/१४-अ,
सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दूरध्वनी क्रमांक : २२७९४१७२
दिनांक : २४ जानेवारी, २०१९.

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना),
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

विषय :- सहायक कक्ष अधिकारी पदावर निवडीद्वारे नियुक्ती देण्यासाठी घेण्यात आलेली सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा २०१८

संदर्भ :- सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.मविप १४१७/प्र.क्र.१३२/१४-अ, दिनांक ०५-११-२०१८

महोदय/महोदया,

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिनांक १९ जानेचारी, २०१९ रोजी घेतलेल्या सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१८ या परीक्षेच्या पेपेर क्र.१ आणि पेपर क्र.२ ची पहिली **उत्तरतालिका** (ANSWER KEY) आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली आहे. (सोबत घोषणेची प्रत जोडण्यात आली आहे).

२. सदरहू घोषणा सहायक कक्ष अधिकारी मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा-२०१८ या परीक्षेस बसलेल्या आपल्या विभागातील सर्व उमेदवारांच्या निदर्शनास आणण्यात यावी, ही विनंती.

३ सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१२४११५७५७९८०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2019.01.24 12:26:27 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) सह सचिव व परीक्षा नियंत्रक, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
५ १/२, ७ व ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-४०००२१

२) कार्यासन १४-अ (संग्रहार्थ/निवडनस्ती).

# महाराष्ट्र लोकसेवा आयोग

## - घोषणा -

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत **दि. 19 जानेवारी, 2019 रोजी झालेल्या 'सहायक कक्ष अधिकारी (मर्यादित) विभागीय परीक्षा** - 2018' या स्पर्धा परीक्षेच्या पेपर क्र.1 व पेपर क्र.2 या वस्तुनिष्ठ स्वरुपाच्या प्रश्नपत्रिकेच्या चारही संचाची प्रथम उत्तरतालिका उमेदवारांच्या माहितीसाठी **www.mpsc.gov.in** या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आली आहे.

**प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरतालिकेतील प्रश्न - उत्तरासंबंधी उमेदवारांना हरकती / अभिवेदने करावयाची असल्यास, ती आयोगाने प्रसिध्द केलेल्या हरकतीच्या नमुन्यातच करावयाची आहेत. आयोगाच्या वरील नमूद केलेल्या संकेतस्थळावर "हरकतीचा नमुना" उपलब्ध आहे. आयोगाने विहित केलेल्या हरकतीच्या नमुन्या व्यतिरीक्त अन्य कोणत्याही नमुन्यातील हरकती स्विकारल्या जाणार नाहीत.** उमेदवारांनी त्यांच्या हरकती / अभिवेदने विहित नमुन्यात परीक्षा नियंत्रक व सहसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, $5^{1/2}$, 7 व 8 वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-400021' या पत्त्यावर पाठवावीत. या संदर्भात **दिनांक 30 जानेवारी, 2019** पर्यंत आयोगाकडे पोहोचलेल्या हरकतींचीच / अभिवेदनांचीच फक्त दखल घेतली जाईल. तद्नंतर आलेल्या हरकती / अभिवेदने विचारात घेतली जाणार नाहीत, याची कृपया नोंद घ्यावी.

**दिनांक** : 23 जानेवारी, 2019.
**ठिकाण** : मुंबई

परीक्षा नियंत्रक व सह सचिव
महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
मुंबई.